**सहायक पोलीस अधीक्षकांची तेरा अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.**
**परिविक्षाधीन भारतीय पोलीस सेवा अधिकारी - ७२ वी तुकडी**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आयपीएस - ०७२० /प्र.क्र.१३५ /पोल-१,**
२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ ऑगस्ट, २०२०.

**वाचा :-** अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.प्रशि २/परि.भापोसे ७२ RR. Batch - २०१९ /४३/२०२०/१२०९, दि.२१.०७.२०२०

**प्रस्तावना :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ७२ व्या तुकडीतील तेरा परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.२०.०७.२०२० ते दि.३०.०१.२०२१ (६ महिने १२ दिवस) पर्यंतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरिता, भारतीय पोलीस सेवेतील कनिष्ठ वेतन श्रेणीतील म्हणजेच पे मॅट्रिक्सच्या स्तर १० या वेतन श्रेणीतील “सहाय्यक पोलीस अधिक्षकांची” तेरा अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव तसेच या तेरा परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे हजर झाल्यापासून ते फेज - II चे प्रशिक्षण कालावधीकरिता दि.२०.०७.२०२० ते दि.३०.०१.२०२१ पर्यंत त्यांचे नावासमोर दर्शविलेल्या जिल्ह्यात प्रशिक्षण कालावधीतील वेतन व भत्ते यासाठी एकूण रु.७६,२०,४४४/- (रुपये शहात्तर लाख, वीस हजार, चारशे चव्वेचाळीस फक्त) इतका खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन आता, खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ७२ व्या तुकडीतील खालील तेरा परिविक्षाधीन भापोसे अधिकाऱ्यांची ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.२०.०७.२०२० ते दि.३०.०१.२०२१ (६ महिने १२ दिवस) पर्यंतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरिता “सहाय्यक पोलीस अधिक्षकांची” तेरा अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रशिक्षणार्थींचे नाव | प्रशिक्षणासाठी नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|
| १ | श्री. अभिनव त्यागी | अहमदनगर |
| २ | श्री. आयुश नोपाणी | अहमदनगर |
| ३ | श्री. बनोथ मृगेंद्र लाल | कोल्हापूर |
| ४ | श्री. धीरज कुमार बच्चु | कोल्हापूर |
| ५ | श्री. गौहार हसन | जालना |
| ६ | श्री. कदम निकेतन बन्सीलाल | अमरावती ग्रामीण |
| ७ | श्री. लोढा श्रेणिक दिलीप | अमरावती ग्रामीण |
| ८ | श्री. एम. रमेश | नंदूरबार |
| ९ | श्री.मिरखेलकर आदित्य धनंजय | सांगली |

| अ.क्र. | प्रशिक्षणार्थीचे नाव | प्रशिक्षणासाठी नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|
| १० | श्री.नित्यानंद झा | सांगली |
| ११ | श्री. पंकज कुमावत | धुळे |
| १२ | श्री. रावले हृषिकेश प्रदीप | उस्मानाबाद |
| १३ | श्रीमती. रितु | सातारा |

२. तसेच संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथील जिल्हा प्रात्यक्षिक प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर, सदरचे अधिकारी संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक येथे हजर झाल्यापासून ते फेज - II चे प्रशिक्षण कालावधीतील दि.२०.०७.२०२० ते दि.३०.०१.२०२१ पर्यंत त्यांचे नावासमोर दर्शविलेल्या जिल्ह्यात प्रशिक्षण कालावधीतील वेतन व भत्ते यासाठी एकूण रु.७६,२०,४४४/- (रुपये शहात्तर लाख, वीस हजार, चारशे चव्वेचाळीस फक्त) इतका खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. उपरोक्त १३ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या वेतन व भत्त्यासाठी होणारा खर्च "२०५५ पोलीस - १०९ (१) जिल्हा पोलीस बल" या उपलेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून वेतन व भत्ते या उद्दीष्टामधून सन २०२० - २१ या वर्षीच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तिय सुधारणा, दिनांक ११ जुलै, २०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२४१६५४०४०३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Tushar Vasant Mahajan

Digitally signed by Tushar Vasant Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, serialNumber=1a39cef3c157b9ee6a2abe5779acf233682613f7b9c335d6bf4877267695ceca, cn=Tushar Vasant Mahajan
Date: 2020.08.25 13:45:10 +05'30'

**( तुषार महाजन )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) १ / २, महाराष्ट्र, मुंबई,
३) अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, कोल्हापूर, जालना, अमरावती ग्रामीण, नंदूरबार, सांगली, धुळे, उस्मानाबाद, सातारा
८) सह संचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती)
९) वित्त विभाग (व्यय -७ / वित्तीय सुधारणा - १), मंत्रालय, मुंबई,
१०)सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई,
११)अवर सचिव, कार्यासन बीयुडी- १, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२)निवड नस्ती, पोल-१.